# ॲन फ्रँक

## महत्त्वाच्या नोंदी

| | |
|---|---|
| 12 जून 1929 | जर्मनीतील *फ्रँकफुर्ट आम माइन* या शहरात ॲन फ्रँकचा जन्म. |
| फेब्रुवारी 1934 | ॲनच्या कुटुंबीयांचे हॉलंडमधील ॲमस्टरडॅम येथे स्थलांतर. तेथील शाळेत प्रवेश. |
| सप्टेंबर 1939 | हिटलरच्या सैन्याचे पोलंडवर आक्रमण. दुसरे महायुद्ध सुरू. |
| 12 जून 1942 | ॲनला तेराव्या वाढदिवशी डायरी भेट. त्यात काल्पनिक मैत्रीण *किट्टी*ला पत्र लिहीले. |
| 6 जुलै 1942 | फ्रँक कुटुंबीय एका गुप्त जागी लपून-छपून राहू लागले. |
| 13 जुलै 1942 | *वॅन पेल्स* कुटुंबीय फ्रँक कुटुंबीयांसह गुप्त जागी राहाण्यास आले. |
| 16 नोव्हेंबर 1942 | *फ्रिट्ज फफ्फेर*ही या गुप्त जागी राहाण्यास आला. |
| 4 ऑगस्ट 1944 | गुप्त जागी लपलेल्या ॲन आणि इतरांना अटक. |
| सप्टेंबर 1944 | कैद्यांना पोलंडमधील *आउश्वित्झ* शहराजवळ उभारलेल्या छळछावणीत पाठवले. |
| ऑक्टोबर 1944 | ॲन आणि मार्गो यांना जर्मनीतील *बर्गन-बेल्सन* या नाझी छळछावणीत पाठवले. |
| फेब्रुवारी/ मार्च 1945 | ॲन आणि मार्गो यांचा साथीच्या तापाने मृत्यू. |
| वसंत 1947 | ॲनची डायरी डच भाषेत प्रकाशित. 1952 साली ही डायरी *ॲन फ्रँक: द डायरी ऑफ अ यंग गर्ल* अशा शीर्षकाने इंग्रजी भाषेतून प्रकाशित. |





जुलै महिन्याच्या एका पावसाळी दिवशी सकाळी एक छोटी मुलगी आणि तिचे आई-वडील आपल्या घरातून बाहेर पडले. तेथील शांत रस्त्यावरून ते घाईघाईत चालू लागले. गरम होत असतानाही त्यांनी अंगावर हिवाळ्याचे जाडजूड कपडे चढवले होते. छोट्या मुलीने दोन बनियन, तीन जोड्या चड्ड्या, एक स्कर्ट, एक जाकीट, दोन जोड्या पायमोजे, बूट, लोकरीची टोपी, गळपट्टा आणि आणखी काही कपडे घातले होते. काही कपडे आणि कागदपत्रे त्यांनी एका बॅगेत ठासून भरले होते. बॅग खूप जड होती आणि वरून पाऊस बरसत होता. पण कुणीही त्यांना आपल्या गाडीत बसायला सांगण्याचे औदार्य दाखवले नाही. आता आपल्याला पुढची दोन वर्षे बाहेरचे जग बघायला मिळणार नाही, हे त्या मुलीला माहीत नव्हते. त्या मुलीचे नाव होते, ॲन फ्रँक.



अॅन फ्रँकचा जन्म जर्मनीत झाला. तिचे आई-वडील, एडिथ आणि ऑट्टो, जर्मनीत राहाणारे ज्यू होते. ते *फ्रँकफुर्ट आम माइन* या छोट्याशा शहरात राहात असत. इथेच ऑट्टोचे वाडवडील पिढ्यानपिढ्या राहात आले होते. मार्गो ही फ्रँक कुटुंबातील मोठी मुलगी होती. 12 जून 1929 रोजी अॅनचा जन्म झाला. फ्रँक कुटुंबाच्या घरासभोवतीचा परिसर रमणीय होता. अॅन तिथे वाळूमध्ये मजेत खड्डा खणत बसे किंवा शेजारपाजारच्या मुलांसोबत खेळत असे.

आई-वडील, मार्गो यांचा प्रेमळ सहवास हेच अॅनचे छोटेसे जग होते. पण बाहेरच्या जर्मनीत मात्र काही अप्रिय घटना घडत होत्या. लोकांना नोकरीवरून काढून टाकण्यात येत होते. अन्न आणि कपडे खरेदी करण्याइतपतही पैसा त्यांच्याकडे उरला नव्हता. आपले भविष्य असुरक्षित वाटू लागल्यामुळे ते भयभीत झाले होते. या साऱ्या समस्यांतून मुक्त करेल असा नेता त्यांना हवा होता. 1933 साली सत्तेवर आलेला *अॅडॉल्फ हिटलर* हा नेता आपल्या अपेक्षा पूर्ण करू शकेल, असे लोकांना वाटू लागले. जर्मनीतील लोक जगात सर्वोत्कृष्ट आहेत, असे हिटलर लोकांना सांगू लागला. जर्मनीतील साऱ्या समस्या ज्यू लोकांमुळे आहेत, असेही त्याने लोकांच्या मनावर बिंबवले. लवकरच त्याने ज्यू लोकांशी भेदभाव करेल, असा कायदा केला. हिटलर आणि त्याच्या समर्थकांना *नाझी* म्हणत. नाझी हे *नॅशनल सोझीयालिस्ट* (नॅशनल सोशालिस्ट) *या* जर्मन शब्दाचे संक्षिप्त रुप आहे.





अॅनच्या वडिलांना ज्यू म्हणून नाझी जर्मनीत राहाणे धोक्याचे वाटत होते. अॅन चार वर्षांची होती तेव्हा ते कुटुंबियांना घेऊन हॉलंड देशातील अॅमस्टरडॅम शहरात राहाण्यास गेले. फ्रँक कुटुंबियांना आपले नवे घर खूप आवडले. घरापासून जवळच समुद्रकिनारा होता. त्यांनी सारी उन्हाळ्याची सुट्टी समुद्रकिनारी मजेत घालवली.

वयाच्या पाचव्या वर्षी अॅन शाळेत जाऊ लागली. हुशार असल्यामुळे ती थोड्याच काळात लिहू-वाचू लागली. आनंदी आणि उत्साही असल्यामुळे तिने अनेक मित्रमंडळी जोडली. तिच्यातील नेतृत्वगुणामुळे तिला शाळेच्या नाटकांमध्ये मुख्य भूमिका देत असत.





1939 साली हिटलरच्या फौजेने पोलंडवर हल्ला केला आणि युरोपच्या भूमीवर युद्ध सुरू झाले. लवकरच, हिटलरची फौज ॲन आणि तिचे कुटुंब राहात होते त्या हॉलंड देशातही पोहोचली.

पण युद्धाच्या छायेतसुद्धा ॲनचे दिवस मित्रमंडळींच्या संगतीत मजेत जात होते. इतिहास, सिनेमातील कलाकार, मांजरी आणि कुत्रे या गोष्टी ॲनला खूप प्रिय होत्या. याशिवाय तिला आणखी एक गोष्ट प्रिय होती – तिची डायरी. ही डायरी तिला तिच्या तेराव्या वाढदिवशी आई-वडिलांनी भेट दिली होती. डायरी मिळाल्यावर ती खूप आनंदीत झाली. ही डायरी तिची सर्वात जवळची मैत्रीण बनली. ती आपल्या डायरीला काही नाव देऊ इच्छित होती. त्यामुळे डायरीतील प्रत्येक लिखाणाची सुरुवात ती *"प्रिय किट्टी"* अशी करू लागली.

हिटलरचे ज्यू विरोधी कायदे हॉलंडमध्ये लागू झाले, त्याबद्दल ॲनने डायरीत लिहून ठेवले. हळूहळू ज्यू लोकांना नोकऱ्यांवरून काढून टाकण्यात आले. त्यांची मालमत्ता जप्त करण्यात आली. सहा वर्षांपेक्षा जास्त वय असणाऱ्या ज्यू लोकांना आपल्या पोषाखावर सहा कोनांची चांदणी, *स्टार ऑफ डेव्हिड,* लावण्याचे बंधन घालण्यात आले. ॲनच्या वडिलांनी कुटुंबियांना घेऊन कुठेरी लपून-छपून राहाण्याचे ठरवले.





जुलै 1942 मध्ये फ्रँक कुटुंबीय एका गुप्त घरात राहाण्यास गेले. ऑट्टो फ्रँक ज्या इमारतीत आपला व्यवसाय करत, त्या इमारतीच्या मागच्या भागात हे घर होते. ॲन याला *मागील गुप्त द्वार* म्हणत असे. फ्रँक कुटुब तिथे आल्यानंतर त्यांनी या घराचे प्रवेशद्वार पुस्तकांच्या कपाटाने झाकले. हे कपाट इथे-तिथे हलवता येत असे. फक्त सात व्यक्तिना फ्रँक कुटुंबाचा हा ठावठिकाणा माहीत होता. त्यांच्यापैकी चार व्यक्ती ऑट्टोच्या कार्यालयात काम करत. शक्य असेल तेव्हा ते फ्रँक कुटुंबियांसाठी लपूनृछपून अन्न आणि कपडे घेऊन येत. ते पकडले गेले असते तर जर्मन सैनिक त्यांना ठार मारू शकत होते.



गुप्त घरात येऊन फ्रँक कुटुंबाला जेमतेम आठवडा झाला आणि *वॅन पेल्स* कुटुंबही तिथे राहायला आले. त्यांच्या पीटर या पंधरा वर्षे वयाच्या मुलाने त्याची मांजर - मुशी - सोबत आणली. ॲन तिची लाडकी मांजर सोबत आणू शकली नव्हती. त्यामुळे मुशीला पाहून ॲनला खूप आनंद झाला. नोव्हेंबर महिन्याच्या शेवटी एक दाताचा डॉक्टर, *फ्रिट्ज फफ्फेर* हासुद्धा गुप्त घरात राहायला आला.



लपून-छपून राहाणे ॲनसाठी सहज-सोपे नव्हते. खूप एकटे-एकटे वाटल्यामुळे ती उबून जात असे. आपली मित्रमंडळी, शाळा आणि सर्वात जास्त आपले स्वातंत्र्य यांची तीव्र उणीव तिला भासत असे. गुप्त घरातील लहानशा जागेत काही अनोळखी लोकांसोबत एकत्र राहाणे तिला कठीण जात असे. कित्येकदा ती आई-वडिल आणि बहिणीसोबत वाद घालत असे. आपले वडिलही आपल्याला समजून घेऊ शकत नाहीत, हे पाहून ती असहाय होत असे. आपले सारे नैराश्य आणि दु:ख ती आपल्या डायरीद्वारे तिच्या सर्वात जवळच्या मैत्रिणीला – किट्टीला - सांगत असे.



गुप्त घरात आल्यानंतर सुरुवातीच्या दिवसांत आपल्याला किती नवखे आणि विचित्र वाटायचे, हे ॲनने किट्टीला सांगितले. आपली मित्रमंडळी, तिची काळी सायकल (ज्यावर स्वार होऊन ती शाळेत जायची), तिच्या मूळ घरातील तिची खोली या सगळ्यांची तिला खूप आठवण येत असे. आपले गुप्त घर कुणाला कळू नये, यासाठी फ्रँक कुटुंब खूप काळजी घेत. दिवसा ते घरात कुजबुज करत बोलत आणि दबक्या पावलांनी चालत. रात्री ते थोडेसे शिथील होत. तरीही खिडकीतून आपल्याला कुणी पाहू नये, याची काळजी मात्र ते घेत. ॲन आणि तिच्या वडिलांनी कापडाच्या चिंध्यांपासून काही पडदे बनवले होते आणि ते खिडक्यांना लावले होते.



पण ॲन तशी शूर होती. स्वतःला कशाततरी गुंतवून आनंदी राहाण्याचा प्रयत्न ती करत असे. आपण इतर विद्यार्थ्यांच्या मागे पडू नये, यासाठी ती शाळेच्या पुस्तकांचे वाचन आणि लिखाण करण्यात वेळ घालवत असे. तिने युरोपातील सर्व राजघराण्यांच्या वंशावळी बनवल्या आणि ती लघुलिपीही शिकली. आपल्या आवडत्या सिनेमा कलाकारांची चित्रे बघत बसणे, हा तिच्यासाठी एक विरंगुळा होता. ही चित्रे तिने आपल्या बेडरुमच्या भिंतींवर चिकटवली होती. लपून-छपून राहातानाही त्यांच्या आयुष्यात काही आनंदाचे आणि आश्चर्याचे क्षण येत. ॲनच्या कुटुंबाची हितचिंतक, *मीप खीस* हिने एकदा ॲनसाठी लाल रंगाचे उंच टाचांचे बूट आणून ॲनला चकीत केले होते.





गुप्त घरातील पोटमाळा ही ॲनची खास जागा होती. कारण या पोटमाळ्याला छोटीशी खिडकी होती. त्यामधून आभाळातील तारे, सूर्यप्रकाश आणि रस्त्याच्या विरुद्ध बाजुला असलेला चर्चचा मनोरा हे दृश्य दिसत असे. ॲन आणि मार्गो वाचन करण्यासाठी नेहमी वर पोटमाळ्यावर जात असत. ॲन आणि पीटर यांच्यात घनिष्ट मैत्री झाल्यावर दोघे नेहमी पोटमाळ्यावरच गप्पा मारत बसत.

युद्ध समाप्तीनंतर आपण आयुष्यात काय बनायचे, वगैरे विचार करत ॲन कधीकधी एकटीच पोटमाळ्यावर बसे. तिला लेखक बनायचे होते. डायरी लिखाणाशिवाय ती परीकथा आणि गोष्टीही रचत असे. *गुप्त घरातील गोष्टी आणि घटना* या नावाच्या एका पुस्तकाचे लिखाणही तिने सुरू केले. डच सरकार युद्ध काळातील सर्व डायऱ्या प्रकाशित करण्याची शक्यता आहे, असे कळताच ती आडव्या रेषा आखलेल्या कागदांवर सुवाच्च हस्ताक्षरात डायरीतील मजकूर उतरवू लागली. एक ना एक दिवस जगभरचे लोक आपले लिखाण वाचतील, असे तिला वाटे.



गुप्त घरातील लोक बाहेरच्या जगापासून अलिप्त होते. पण तरीही ऑट्टोच्या कार्यालयात असलेल्या रेडिओवर ते जगभरच्या बातम्या ऐकत. रात्रीच्या वेळी ते गुपचुप कार्यालयात जात आणि रेडिओ सुरू करत. युद्धात जर्मन सैन्याची हार होत आहे, हे ऐकून ॲनच्या आशा प्रफुल्लित झाल्या आणि तिने आपल्या डायरीत लिहिले, “एवढं सगळं होऊनही मला वाटतं, लोक खूप चांगले असतात.”




पण कुणालातरी फ्रँक कुटुंबाच्या गुप्त घराचा सुगावा लागला आणि त्याने पोलिसांना त्याची खबर दिली. 4 ऑगस्ट 1944 रोजी त्या गुप्त घरावर जर्मन आणि डच नाझींनी छापा टाकला. त्यांनी ॲनसह सर्व लोकांना अटक केली. फ्रँक कुटुंबीय, वॅन पेल्स आणि फ्रिट्ज फफ्फेर यांना पोलीस हॉलंडमधील *वेस्टरबोक* गावानजिक एका छळछावणीत घेऊन गेले. तिथे त्यांना नाझींसाठी काम करावे लागले.



एका महिन्यानंतर त्यांना पोलंडमधील *आउश्वित्झ* छळछावणीत पाठवले. तेथील परिस्थिती खूप भयानक होती. ॲन, मार्गो आणि त्यांच्या आईला पुरेसे अन्नपाणी आणि कपडे मिळत नसत. पण त्यांना काम खूप करावे लागे. त्यांच्यासोबत असलेले अनेक लोक भूक आणि आजारामुळे मृत्यू पावले. कित्येक कैद्यांना नाझींनी ठार केले. ऑक्टोबर महिन्यात दोन्ही मुलींना जर्मनीतील *बर्गन-बेल्सन* या नाझी छळछावणीत पाठवले. त्यांच्या आई-वडिलांना मात्र आउश्वित्झ छळछावणीतच ठेवले. तिथेच त्यांची आई एडिथ हिचे हॉस्पीटलमध्ये निधन झाले. त्यावर्षी हिवाळ्यात कडाक्याची थंडी पडली. दोन्ही मुली गंभीररित्या आजारी पडल्या. मार्गोचा टायफस तापाने मृत्यू झाला. थोड्याच दिवसात ॲनचाही मृत्यू झाला. त्यावेळी तिने वयाची सोळा वर्षेही पूर्ण केली नव्हती.



एके दिवशी मीप खीसला ॲनची डायरी आणि इतर लेख सापडले. तिने ते सर्व जपून ठेवले. युद्ध समाप्त झाल्यावर ॲनचे वडील पुन्हा ॲमस्टरडॅमला परतले. गुप्त घरात जितके लोक राहात होते, त्यांपैकी फक्त ॲनचे वडील आउश्वित्झच्या थंडीला तोंड देऊ शकले. मीपने दिलेली ॲनची डायरी त्यांनी वाचली आणि ती प्रकाशित करायचे ठरवले.



अॅनची डायरी खूप लोकप्रिय झाली आणि अनेक भाषांमध्ये तिचा अनुवाद झाला. अॅनचे धैर्य आणि परिपक्वता पाहून लोक आश्चर्यचकीत झाले. लोकांनी तिच्या आयुष्यावर एक नाटक बनवले. ती आणि तिचे कुटुंब ज्या गुप्त घरात राहिले, त्या घराचे संग्रहालयात रुपांतर केले गेले. अॅन फ्रँकची स्मृती आजही लोकांच्या मनात वसलेली आहे. तिचे शब्द जगातील लाखो लोकांना प्रेरणा देतात.



# लेखकाचे मनोगत

सुरुवातीला 1947 साली ॲन फ्रँकच्या डायरीच्या फक्त 1500 प्रती प्रकाशित केल्या गेल्या. लवकरच, जर्मन आणि फ्रेंच भाषेत तिचा अनुवाद प्रकाशित झाला. इंग्रजीतील अनुवाद 1952 साली प्रकाशित झाला. तेव्हापासून ही डायरी सुमारे पन्नासपेक्षा जास्त भाषांमध्ये अनुवादित झाली आहे. तिच्या अडीच कोटींपेक्षा जास्त प्रती विकल्या गेल्या आहेत. ॲनला बहुधा आशा वाटत होती की एक ना एक दिवस तिची डायरी प्रकाशित होईल. म्हणून तिने वॅन पेल्स कुटुंबीय, फ्रिट्ज फफ्फेर आणि इतर डच मित्रांसाठी वेगळी नावे वापरली. पण ही नावे आता सर्वपरिचित झाल्याने या पुस्तकात मी खरीच नावे वापरली आहेत.

नाझींच्या छळछावणीत मृत्यूमुखी पडलेल्या ज्यू लोकांची नेमकी संख्या ज्ञात नाही. पण नाझींनी जवळजवळ साठ लाख ज्यू लोकांना ठार केले असावे, असे मानतात. ज्यू लोकांशिवाय जिप्सी, गुलाम, कम्युनिस्ट वगैरे लोकांचीही नाझींनी कत्तल केली.

ज्यू लोकांना गुलामांसारखे राबवून काम करून घेण्यासाठी नाझींनी अनेक छळछावण्या उभारल्या होत्या. ज्यू लोकांना विषारी गॅस वापरून ठार मारण्यासाठीही त्यांनी काही छळछावण्या, विशेषता: पोलंडमध्ये, उभारल्या होत्या. या छळछावण्यांबद्दल गुप्तता पाळण्यात येत असे. ॲनचे आईवडील कैद होते ती आउश्वित्झ छळछावणी अशाच प्रकारची होती. मार्गो आणि ॲन या छळछावणीत फार काळ राहिल्या नव्हत्या. या दोघी तरुण असल्यामुळे त्यांच्याकडून जास्त काम करून घेता येईल, असे नाझींना वाटत असावे.

ही कथा मुलांना ऐकवण्यामागे काय हेतू आहे? ॲन फ्रँकची आत्मकथा लिहिण्याआधी सर्वप्रथम हा प्रश्न मी स्वत:ला विचारला. मुलांना युद्ध, जातीवाद, मृत्यू यांसारख्या गोष्टी समजणे बऱ्याचदा कठीण जाते. पण काही वेळा त्यांना गूढ वाटणाऱ्या गोष्टीही सांगणे गरजेचे असते. हाच हेतू ठेवून मी हा प्रयत्न केला आहे.

******